क्रमांक: उसप-१३०५/प्र.क्र.७५/२००५/१४,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १९ एप्रिल, २०११

पहा:- १) सा.प्र.वि. आदेश क्रमांक:- उसप-१३०५/प्र.क्र.७५/०४/का.१४, दि.१५.०२.२००६
२) सा.प्र.वि. पत्र क्रमांक:- बीसीसी-२००१/१८८७/प्र.क्र.६४/०१/१६-ब, दि.१.०४.२००८

**आदेश**

उपरोक्त संदर्भाधिन आदेशान्वये सन २००५-०६ च्या निवडसूचीवर पात्र ठरलेल्या अधिकाऱ्यांचे उपसचिव पदावरील आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. तथापि, श्रीमती थोरवे यांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यामुळे त्यांचे पदोन्नतीचे आदेश निर्गमित करण्यात आले नाहीत. आता त्यांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर केल्यामुळे त्यांचे उपसचिव पदावर पदोन्नतीचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

याचिका क्र.८४५२/२००४ च्या संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन पत्रान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता याचिका क्रमांक ८४५२/२००४ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून खालील कु. कांचन थोरवे, अवर सचिव यांना उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अवर सचिवाचे नांव | सध्याचा विभाग | उप सचिव पदावरील पदोन्नतीने पदस्थापना दिलेला विभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | कु. कां. च. थोरवे | विधी व न्याय विभाग | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग |

२. कु. कांचन थोरवे, यांची उप सचिव पदावरील तदर्थ पदोन्नती त्यांच्याविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन तसेच खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(अ) वरील अधिका-यांची तदर्थ पदोन्नती मुंबई उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक ८४५२/२००४ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहील.
(ब) सदर तदर्थ पदोन्नती प्रथम अकरा महिने किंवा सामान्य प्रशासन विभागाकडून निवडसूचीवरील नियमित अवर सचिव नियुक्त होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीकरिता असेल.
(क) वरील अधिका-यांची सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात आली आहे.
(ड) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिका-यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०४२०१३३५३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-
**(म. चिं. पाटील)**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

२. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
३. प्र.स.(सेवा), सा.प्र.वि.,
४. प्रधान सचिव/सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग/वि. व न्या. वि.
५. सह/उप सचिव/(आस्थापना), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग/वि.व न्या. वि.
६. संबंधित अधिकारी (विभागामार्फत)
७. सा.प्र.वि./का.१३/का.१०.,
८. निवडनस्ती/का.१४